**गोदाम दुरूस्तीच्या कामासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत**
**सन २०१६-१७**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११६/प्र.क्र.१२५४/नापु-१६ ब**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०९ मार्च, २०१७

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः गोधादु- १००९/प्र.क्र.१३३/नापु-१६ अ,दिनांक १०.६.२०१०
२) शासन निर्णय क्रमांकः गोदाब्दु- १११२/१७७/प्र.क्र.२११/नापु-१६ब,दिनांक ३०.०१.२०१३
३) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११५/प्र.क्र.९९६/नापु-१६ ब,दिनांक १०.६.२०१५
४) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११६/प्र.क्र.१२५४/नापु-१६ ब,दिनांक २१.११.२०१६

**प्रस्तावना**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील शिधापत्रिका धारकांना जीवनावश्यक वस्तूचे वितरण करण्यात येते. भारतीय अन्न महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या अन्नधान्याची साठवणूक राज्य शासनाच्या गोदामामध्ये केली जाते. सदरहू राज्य शासकीय़ गोदामांच्या दुरूस्तीच्या प्रस्तावांची सार्वजनिक बांधकाम विभागाकडून आवश्यकतेनुसार छाननी केल्यानंतर गोदाम दुरूस्ती प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सन २०१०-११ व सन २०१२-१३ मध्ये प्रशासकीय मान्यता दिलेल्या गोदाम दुरूस्ती कामास निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

शासकीय गोदाम दुरूस्तींच्या कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या आदेशामधील अटींच्या अधीन राहून पुढील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे निधी उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे स्वरूप | अंदाजित रक्कम (रू.) | सदर आदेशान्वये उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी रू. |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | यवतमाळ | तिळापुर | पांढरकवडा | जमिन, कॉंक्रिट, ग्रील, गेट इ. | ४८,४३,९३९ | ५,८३,४४६ |
| २. | नाशिक | नांदगाव | शासकीय गोदाम मनमाड (लाहोर शेड) (गोदाम क्र.२ व ३) | प्लेन पत्रा बसविणे,शहाबादी फरशी बदलणे,दरवाजे बदलणे,रंगरंगोटी करणे,संरक्षण भिंत बांधणे इत्यादी कामे करणे | २८,८९,४५४ | २८,८९,४५४ |
| | | | | एकूण | | ३४,७२,९०० |
| | | **एकूण रू. चौतीस लक्ष बहात्तर हजार नऊशे फक्त.** | | | | |

२. वरीलप्रमाणे निधी उपलब्ध करून दिलेल्या शासकीय गोदाम दुरूस्तीचे काम तातडीने सुरू करण्य़ात येऊन पूर्ण करण्यात यावे. गोदाम दुरूस्ती सुरू झाल्यानंतर प्रथम दुरूस्तीचा संपूर्ण तपशील तसेच संबंधित दुरूस्तीचा दरमहा आढावा घेऊन दुरूस्तीची प्रगती जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी शासनास सादर करावी.

३. सदरील शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी घ्यावी.

४. सदर गोदामाच्या दुरूस्तीचे काम पूर्ण झाल्यानंतर सदरचे काम हे मंजूर अंदाजपत्रकाप्रमाणे उत्कृष्ट झाल्याबाबतची खातरजमा संबंधीत कार्यकारी अंभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी संयुक्तरित्या करून तसा स्थल निरिक्षण अहवाल तयार करावा व तो अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

५. दुरूस्तीस विलंब अथवा इतर कारणांनी गोदाम दुरूस्तीस वाढीव खर्च होणार नाही याबाबतची दक्षता घ्यावी. सदरहू निधी ठेव म्हणून वर्ग करता/ठेवता येणार नाही, याची नोंद घ्यावी.

६. सन २०१६-१७ या वित्तीय वर्षामध्ये सदर गोदाम दुरूस्तीचा खर्च "मागणी क्रमांक एम-२, मुख्य लेखाशिर्ष २४०८ अन्न साठवण व वखार साठवण, (०३) प्रापण वितरण व किंमत नियंत्रण (०३)(०२) मुफसल, (योजनेतर)(दत्तमत) (२४०८ ०१०८) २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. त्याचप्रमाणे काही कारणास्तव संबधित गोदाम दुरूस्तीचे कामावर उपलब्ध करून दिलेला निधी खर्ची पडण्याची शक्यता नसल्यास त्याबाबतच्या कारणमीमांसेसह शासनास अहवाल सादर करावा. सदरहू आदेशान्वये वितरित केलेला निधी २० मार्च, २०१७ पूर्वी निधी खर्च न झाल्यास सदर निधी काढून घेण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालयामार्फत करण्यात यावी.

८ प्रशासकीय मान्यतेच्या आदेशात कामाचे संक्षिप्त स्वरूप नमूद करण्यात आलेले असून प्रत्यक्षात गोदाम दुरूस्तीचे काम शासनास सादर केलेल्या दुरूस्ती कामांच्या अंदाजपत्रकानुसारच पूर्ण करण्यात यावे. म्हणजेच शासनास सादर केलेल्या अंदाजपत्रकात समाविष्ट बाबीनुसार गोदाम दुरूस्तीचे काम पूर्ण करण्यात यावे.

९. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग-१ उप भाग-५ मधील अनुक्रमांक ३ व १० नुसार तसेच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१४१६५८५८७००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Deoman Baswant

Digitally signed by Sunil Deoman Baswant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P. Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8883fe608dc825b4f80204357f8a6fadfe8507e0636b91f3c5fefef9c43acfe1, cn=Sunil Deoman Baswant
Date: 2017.03.14 16:59:22 +05'30'

(सु.दे.बसवंत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उप आयुक्त (पुरवठा), अमरावती,नाशिक
२. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
३. जिल्हाधिकारी/जिल्हा पुरवठा अधिकारी यवतमाळ,नाशिक.
४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यवतमाळ,नाशिक.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ,नाशिक.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
७. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)
९. वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय व अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई.
१०. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
११. सहाय्यक संचालक (संगणक), लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.
१२. निवड नस्ती/नापु-१६ब.